**लोकनेते गोपीनाथ मुंडे यांच्या स्मरणार्थ दिनांक ०३ ते ०९ जुन या कालावधीत राज्यात पर्यावरण सप्ताह साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मग्रारो-२०१५/प्र.क्र.५६/मग्रारो-१**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक)
मंत्रालय मुंबई-३२
दिनांक २६ मे,२०१५

**प्रस्तावना**

महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी अधिनियम १९७७ (दिनांक ०६ ऑगस्ट, २०१४ पर्यंत सुधारित) मधील अनुसूचि २ मधील परिच्छेद ३. (१) I (v) नुसार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत वृक्ष लागवड व संवर्धन करण्यास मान्यता देण्यात आलेली असून त्याद्वारे राज्यात वृक्ष लागवड व संवर्धनाची कामे हाती घेण्यात आलेले आहेत. राज्यात वृक्ष व फळबाग लागवड व त्याचे संगोपन व संरक्षण या कार्यक्रमावर भर देण्यात आलेला आहे. त्यासाठी शासनाने विविध शासन निर्णय व परिपत्रकान्वये योग्य त्या सुचना सर्व संबंधितांना देण्यात आलेल्या आहेत. दिनांक ०५ जुन हा जागतिक पर्यावरण दिन म्हणून पाळला जातो व या दिवशी पर्यावरणाचा समतोल राखण्याबाबत जनजागृती करण्यात येते तसेच वृक्ष लागवडीचा कार्यक्रम हाती घेण्यात येतो. या पर्यावरण दिनाचे औचित्य साधून लोकनेते गोपीनाथ मुंडे यांच्या स्मरणार्थ दरवर्षी राज्यात पर्यावरण सप्ताह साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या बाबतचा शासन निर्णय खालील प्रमाणे आहे.

**शासन निर्णय -**

लोकनेते गोपीनाथ मुंडे यांनी केंद्र सरकारमध्ये ग्रामीण विकासमंत्री या नात्याने व महाराष्ट्र राज्याचे उपमुख्यमंत्री या नात्याने देशासाठी व राज्यासाठी प्रभावी कामगिरी केलेली आहे. त्यांचे हे योगदान विचारात घेता त्यांना भावपुर्ण श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत वृक्ष लागवड करून पर्यावरणाचा समतोल राखण्यासाठी पर्यावरण दिनाचे औचित्य साधून दरवर्षी दिनांक ०३ जुन ते ०९ जुन या कालावधीत पर्यावरण सप्ताह घोषित करण्यात येत आहे. सदर पर्यावरण सप्ताहामध्ये संपुर्ण राज्यात वृक्ष लागवडीचा कार्यक्रम महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत मोठ्या प्रमाणात हाती घेण्यात यावा. सदर पर्यावरण सप्ताहामध्ये जलयुक्त शिवार अभियानातील निवडण्यात आलेल्या गावांना प्रधान्य देण्यात यावे. वृक्ष लागवडीचा कार्यक्रम हा प्राथमिक/माध्यमिक शाळेची ठिकाणे, अंगणवाडी, आरोग्य केंद्रे, समाजमंदीर, गावठाण, गायरान, ग्रामपंचायतीच्या मालकीची जमीन, शासकीय/निमशासकीय कार्यालये व रस्ता दुतर्फा ईत्यादि ठिकाणी प्राधान्याने घेण्यात यावा. या कार्यक्रमासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, पुणे यांनी योग्य प्रतीच्या रोपांचा पुरवठा सर्व संबंधितांना करण्याची व्यवस्था करावी.

सर्व जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी उपरोक्त पर्यावरण सप्ताहाचे आयोजन करावे, तसेच जिल्हयाचे पालकमंत्री/जिल्हा परिषद अध्यक्ष/लोकप्रतिनिधी यांच्या हस्ते दरवर्षी दिनांक ०३ जुन रोजी किमान एका गावामध्ये पर्यावरण सप्ताहाचा शुभारंभ करावा. सदर पर्यावरण सप्ताहामध्ये सक्रीय लोकसहभाग घेण्यात यावा. तसेच वृक्ष लागवड करावयाच्या कार्यक्रमाचे गावनिहाय नियोजन

करावे. प्रसिध्दीसाठी दिलेल्या जलयुक्त शिवार व रोहयो निधीतून सदर पर्यावरण सप्ताहास मोठ्या प्रमाणात प्रसिध्दी देण्यात यावी. विभागीय आयुक्त यांनी उपरोक्त पर्यावरण सप्ताहामध्ये हाती घेतलेल्या कार्यक्रमाचा अहवाल सोबतच्या प्रपत्रात शासनास दरवर्षी दिनांक २० जुन पर्यंत सादर करावा. पर्यावरण सप्ताहाच्या कार्यक्रमाचे योग्य ते संनियंत्रण विभागीय आयुक्त यांनी करावे व विभागामध्ये सप्ताह यशस्वी होण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी.

पर्यावरण सप्ताहात हाती घेण्यात येणाऱ्या वृक्ष लागवड कार्यक्रमाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय/परिपत्रके यातील नरेगाच्या मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे तसेच महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी अधिनियम १९७७ (दिनांक ०६ ऑगस्ट, २०१४ पर्यंत सुधारित) मधील तरतुदीचा भंग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२६१४५९५९६३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivekanand P Kale

Digitally signed by Vivekanand P Kale
DN: CN = Vivekanand P Kale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.26 17:17:26 +05'30'

**(वि.पु.काळे)**
**अवर सचिव(रोहयो)**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक,
५) अतिरिक्त मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.(प्रसिध्दीकरिता)
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) आयुक्त, मग्रारोहयो, नागपूर
११) सर्व जिल्हाधिकारी (बृहन्मुंबई वगळून),
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
१३) प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर,
१४) आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे,

१५) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे,
१६) संचालक, फलोत्पादन, पुणे,
१७) प्रधान मुख्य वन संरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,पुणे,
१८) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर,
१९) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर,
२०) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
२१) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
२२) मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्तर) विभाग,पुणे,
२३) उप सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ रोजगार हमी समिती, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय मुंबई,
२४) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो),
२५) कक्ष अधिकारी,संग्राम कक्ष,ग्राम. व जलसं. विभाग,मंत्रालय,मुंबई.(महाऑनलाईनवर प्रसिद्धीसाठी)
२६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी,
२७) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (रोहयो),
२८) सारसंग्रह रोहयो-१/निवडनस्ती, रोहयो-१.

दिनांक ०३ जुन ते ०९ जुन, या कालावधीत संपन्न झालेल्या पर्यावरण सप्ताहाचा दरवर्षीचा अहवाल.

| अ.क्र. | जिल्हा | जलयुक्त शिवार मधील गावांची संख्या | पर्यावरण सप्ताह आयोजित केलेल्या गावाची संख्या | लागवड केलेल्या रोपांची संख्या | खर्च (रू. लक्ष्य) | | | निर्मित मणुष्य दिन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | लागवड | प्रसिध्दी | एकूण | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |

विभागीय आयुक्त

टिप :सन २०१६- १७ या वर्षापासून उपरोक्त अहवालामध्ये मागील वर्षी लागवड केलेल्या रोपांची जिवंत झाडांची संख्या व त्याची टक्केवारी नमुद करावी.